**गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजनेंतर्गत दि.२३.०८.२०२२ ते दि.१८.०४.२०२३ या खंडीत कालावधीतील प्राप्त झालेले पात्र दावे निकाली काढण्यासाठी रु. ७.०७ कोटी इतकी रक्कम वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक शेअवि-२०२३/प्र.क्र.१२९/११-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- २१ फेब्रुवारी, २०२५.

**संदर्भ :-** १) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. शेअवि-२०१८/प्र.क्र.१९३/११-अे, दि.३१.०८.२०१९.
२) कृषि व पदुम विभाग, शासन परिपत्रक क्र.शेअवि-२०१८/प्र.क्र. १९३/ ११-अे, दि.१९.९.२०१९.
३) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. शेअवि-२०२१/प्र.क्र.९८/११-अे, दि.२८.११.२०२२.
४) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. शेअवि-२०२०/प्र.क्र.३३०/११-अे, दि.१९.४.२०२३.
५) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. शेअवि-२०२१/प्र.क्र.९८/११-अे,दि.७.७.२०२३.
६) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. शेअवि-२०२१/प्र.क्र.९८/११-अे,दि.६.२.२०२४.
७) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. शेअवि-२०२१/प्र.क्र.१२९/११-अे,दि.३०.०३.२०२४.
८) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. शेअवि-२०२३/प्र.क्र.१२९/११-अे, दि. ०४.०९.२०२४
९) संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. गोमुंशेअवि-२०२२/प्र.क्र.१३१/ का.सां-९/२३१५६/२०२४, दि.१२.०९.२०२४
१०) संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. गोमुंशेअवि-२०२२/प्र.क्र.१३१/ का.सां-९/२४८३९/२०२४, दि.०८.१०.२०२४

**प्रस्तावना :-**

गोपिनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजनेअंतर्गत दि.०७.०४.२०२२ ते दि.२२.०८.२०२२ या खंडीत कालावधीमध्ये प्राप्त झालेले प्रस्ताव निकाली काढण्यासाठी विशेष बाब म्हणून संदर्भ क्र. (३) अन्वये मान्यता देण्यात आली आहे. तद्नंतर प्रचलित गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजनेमध्ये सुधारणा करुन संदर्भ क्र.(४) येथील शासन निर्णयान्वये "गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात सुरक्षा सानुग्रह अनुदान योजना" लागु करण्यात आली असुन योजनेंतर्गत प्रशासकीय कारणास्तव पडलेल्या दि.२३.०८.२०२२ ते १८.०४.२०२३ या खंडास, "खंडीत कालावधी" म्हणून घोषित करण्यास, तसेच, सदर खंडीत कालावधीतील पात्र विमा दावे मंजूर करण्यास संदर्भ क्र. (५) अन्वये मान्यता देण्यात आली आहे. तसेच, सदर खंडीत कालावधीतील पात्र विमा दाव्यांच्या अनुषंगाने अपघातग्रस्त शेतकरी/ वारसदारांना आर्थिक मदतीची रक्कम शासनामार्फत अदा करण्यासाठी संदर्भ क्र. (६) अन्वये रु.४७.१२ कोटी, संदर्भ क्र. (७) अन्वये रु.१७.६० कोटी व संदर्भ क्र. (८) अन्वये रु.१०.०६ कोटी अशा प्रकारे एकूण रु.७४.७८ कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

संचालक(विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे यांनी संदर्भ क्र. (९) अन्वये दि.२३.०८.२०२२ ते १८.०४.२०२३ या खंडीत कालावधीतील त्रुटीपूर्तता होऊन पात्र ठरलेले १८४ (१७८ मृत्यु + ६ अपंगत्व) दावे निकाली काढण्यासाठी रु.३.६२ कोटी आणि संदर्भ क्र.(१०) अन्वये सदर खंडीत कालावधीतील पाचव्या टप्प्यातील १७५ (१७० मृत्यु + ५ अपंगत्व) पात्र विमा दाव्यांसाठी एकूण

रु.३.४५ कोटी अशा प्रकारे योजने अंतर्गत पात्र दाव्यांच्या अनुषंगाने अपघातग्रस्त शेतकरी/वारसदारांना आर्थिक सहाय्य अदा करण्यासाठी एकूण रु.७.०७ कोटी इतका निधी वितरीत करण्याची मागणी केली आहे. सबब, गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजने अंतर्गत दि.२३.०८.२०२२ ते दि.१८.०४.२०२३ या खंडीत कालावधीतील पात्र प्रस्तावांच्या अनुषंगाने अपघातग्रस्त शेतकरी/वारसदारांना आर्थिक मदतीची रक्कम शासनामार्फत अदा करण्यासाठी रु. ७.०७ कोटी इतकी रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजने अंतर्गत दि.२३.०८.२०२२ ते दि.१८.०४.२०२३ या २३९ दिवसाच्या खंडीत कालावधीतील संदर्भ क्र.(९) अन्वये त्रुटीपूर्तता होऊन पात्र ठरलेले १८४ (१७८ मृत्यु + ६ अपंगत्व) दावे निकाली काढण्यासाठी रु.३.६२ कोटी आणि संदर्भ क्र.(१०) अन्वये सदर खंडीत कालावधीतील पाचव्या टप्प्यातील १७५ (१७० मृत्यु + ५ अपंगत्व) पात्र विमा दाव्यांसाठी एकूण रु.३.४५ कोटी अशा प्रकारे योजने अंतर्गत पात्र दाव्यांच्या अनुषंगाने अपघातग्रस्त शेतकरी/ वारसदारांना आर्थिक सहाय्य अदा करण्यासाठी एकूण रु.७.०७ कोटी इतकी रक्कम गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजनेंअंतर्गत सन २०२४-२५ या वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या निधीमधून वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ करिता मंजूर केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

**मागणी क्र. डी - ३**
**२४०१ पीक संवर्धन**
**(००) (०६) गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजना (कार्यक्रम)**
**(२४०१ ४४२७) राज्य योजना - ३३ अर्थसहाय्य**

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारा निधी संदर्भ क्र. (१) व (२) च्या शासन निर्णय/ परिपत्रकात नमूद तरतूदीनुसार, तसेच, योजनेच्या मार्गदर्शक सूचना आणि अटी व शर्तीनुसारच संदर्भ क्र.(५) अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन खर्च करण्याची जबाबदारी, आयुक्त (कृषि) यांची राहील.

४. सदरचा निधी हा आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या छाननी समितीने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन संदर्भ क्र.(९) व (१०) येथील पत्रासोबत प्राप्त यादीतील पात्र शेतकऱ्यांच्या / वारसदाराच्या बँक खात्यात ECS व्दारे उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी, आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

५. उपरोक्त प्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र, आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे शासनास सादर करतील.

६. प्रस्तुत प्रयोजनार्थ जिल्हास्तरावर जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी यांना "नियंत्रण अधिकारी" तर, संबंधित जिल्हयाचे जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी यांना, "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

७. प्रस्तुत शासन निर्णय, नियोजन विभाग व वित्त विभागाने त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनुक्रमे अनौसं. क्रमांक ३३/का.१४३१, दि.१७.०१.२०२५ व अनौसं. क्रमांक ३०/२५/व्यय-१, दि.२९.०१.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक २०२५०२२११२४२४६७५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

UMESH NARAYAN CHANDIWADE

Digitally signed by UMESH NARAYAN CHANDIWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CCBE80FCC6B64503B4E8B1269BD88D631F3F3C2BEF6E1CA70CC9A4E30954011F, cn=UMESH NARAYAN CHANDIWADE
Date: 2025.02.21 17:23:46 +05'30'

**( उमेश चांदिवडे )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३) मा. उपमुख्यमंत्री (१) यांचे प्रधान सचिव
४) मा. उपमुख्यमंत्री (२) यांचे प्रधान सचिव
५) मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
६) मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
७) सर्व मा.मंत्री/मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
८) सर्व मा. विधानमंडळ सदस्य
९) मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव,मंत्रालय,मुंबई ३२
१०) प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
११) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२) उपसचिव, (११-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१३) उपसचिव, (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१४) सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१५) सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१६) सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी
१७) सर्व जिल्हा परिषदांचे, जिल्हा कृषि विकास अधिकारी
१८) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरीक्षा), मुंबई.
१९) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, ( लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
२०) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरीक्षा), नागपूर
२१) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता),नागपूर
२२) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
२३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
२४) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे

२५) मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२६) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२७) सर्व उप विभागीय कृषि अधिकारी
२८) निवडनस्ती, कार्यासन ११-अे.